पंचायत समिती, केज (जि. बीड) येथील प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०२२/प्र.क्र.१२८/बांध-४

५ वा मजला, २५ मर्झबान पथ, बांधकाम भवन,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१

तारीख : ०३ मे, २०२३

**वाचा :-**

१) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** पंसई-२०१६/प्र.क्र.२०/पंरा-७, दिनांक ११ फेब्रुवारी, २०१६.

२) **कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, बीड यांचे पत्र क्रमांकः** जिपबी/बांवि२/निविदा/कावि/९७१/२०२२, दिनांक ०४ ऑगस्ट, २०२२.

३) **कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, बीड यांचे पत्र क्रमांकः** जिपबी/बांवि२/निविदा/कावि/११८३/२०२२, दिनांक १९ सप्टेंबर, २०२२.

**प्रस्तावना :-**

कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, बीड यांनी वाचा मधील अनुक्रमांक २ व ३ येथील पत्रान्वये, पंचायत समिती, केज (जि. बीड) येथील प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

**०२.** ग्राम विकास विभागाच्या उक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दिनांक ११ फेब्रुवारी, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये, पंचायत समिती, केज (जि. बीड) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रू.४४८.४८ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. पंचायत समिती, केज (जि. बीड) प्रशासकीय इमारतीचे बांधकाम जवळपास पुर्ण झालेले आहे. मुख्य इमारत बांधकामाच्या पेव्हर ब्लॉक व कॉन्क्रीटच्या बाबींमध्ये वाढ झाल्यामुळे तसेच, मुळ प्रशासकीय मान्यतेमध्ये GST बाबीचा समावेश नव्हता, सद्यस्थितीत सदर इमारतीचे बांधकाम जवळपास पुर्ण झाले असल्याने GST ची रु.५३.२६ लक्ष रक्कम शासन खाती भरणे आवश्यक असल्याने या तदतूदीचा अंदाजपत्रकामध्ये समावेश केल्याने, पंचायत समिती, केज (जि. बीड) येथील प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रू.४४८.४८ लक्ष इतक्या मुळ प्रशासकिय

मान्यतेमध्ये ६७.२७ लक्ष (१४.९९ टक्के) इतकी वाढ झालेली आहे. यास्तव, कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, बीड यांनी पंचायत समिती, केज (जि. बीड) येथील प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रू.५१५.७५ लक्ष इतक्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केलेली आहे.

०३. कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, बीड यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती पंचायत समिती, केज (जि. बीड) येथील प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रू. ५१५.७५ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

पंचायत समिती, केज (जि. बीड) येथील प्रशासकीय इमारत बांधकामाच्या मुळ प्रशासकीय मान्यता रूपये ४,४८,४८,०००/- रकमेमध्ये रू.६७,२७,०००/- इतकी वाढ करून रू.५,१५,७५,०००/- (रूपये पाच कोटी पंधरा लक्ष पंच्याहत्तर हजार फक्त) इतक्या रकमेच्या सुधारित अंदाजपत्रकास, या शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. पंचायत समिती, केज (जि. बीड) येथील प्रशासकीय इमारत बांधकामाच्या मुळ प्रशासकीय व सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकाचा तुलनात्मक गोषवारा गोषवारा पुढीलप्रमाणे आहे.

| General Abstract For Construction of Kej P. S. Administrative Building Revise A.A. (Dist. Beed) | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of Item** | **As per A.A. (In Rs.)** | **As per Revise (In Rs.)** | **Saving (In Rs.)** | **Excess (In Rs.)** |
| *1* | *2* | *3* | *4* | *5* | *6* |
| 1. | Cost of Working portion | 33720390.00 | 38305053.00 | 0.00 | 4584663.00 |
| 2. | Tender 0.25% below | 0.00 | -95763.00 | 95763.00 | 0.00 |
| 3. | Add 11 % for Electrification | 3709242.90 | 1935451.00 | 1773791.90 | 0.00 |
| 4. | Add 8 % for Water Supply and Sanitation | 2697631.20 | 1405637.00 | 1291994.20 | 0.00 |
| 5. | Add 2 % for Rain Water Harvesting anf Fire Fighting | 674407.80 | 465853.00 | 208554.80 | 0.00 |
| 6. | Add 6 % for Price Variation | 2023223.40 | 4233048.00 | 0.00 | 2209824.60 |
| 7. | Add 2 % for Computerization | 674407.80 | 0.00 | 674407.80 | 0.00 |
| 8. | Add 4 % for Contingencies | 1348815.60 | 0.00 | 1348815.60 | 0.00 |
| 9. | Add 12% for G.S.T. Charges | 0.00 | 5325633.00 | 0.00 | 5325633.00 |
| **Total** | | **44848118.70** | **51574912.00** | **5393327.40** | **12120121.60** |
| **Additional Ammount (Total Column 6- Total Column 5)** | | **4,48,48,000/-** | **5,15,75,000/-** | | **6726794.20** |
| **Total** | | | | | **67,27,000/-** (१४.९९ % वाढ) |

**०३.** उपरोक्त बांधकामासाठी संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरूपात, टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करून दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात येईल. पंचायत समिती, बीड (जि. बीड) येथील प्रशासकीय इमारत बांधकामासाठी आतापर्यंत वितरीत करण्यात आलेला रू.३८९.६३ लक्ष इतका निधी वजा जाता उर्वरित रू.१२६.१२ लक्ष इतका निधी जिल्हा परिषदेला देय राहील. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**०४.** प्रस्तुत कामात पुन:श्च कोणतीही भाववाढ यापुढे देय होणार नाही. सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत लेखे अंतिम करण्यात यावेत.

**०५.** प्रस्तुतचा शासन निर्णय हा वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच, अनुक्रमांक ९, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ स्तंभ - ५ खाली, प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५०२१६२७१९६३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by PATIL PRASHANT VINAYAKRAO
Date: 2023.05.03 13:09:57 +05'30'

**(प्रशांत पाटील)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२) अ.मु.स. (ग्रा. वि. व पं. रा.), मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र -२, नागपूर.
५) विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
६) मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड.
८) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड.
९) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, बीड.
१०) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, बीड.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा बीड.
१२) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१३) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
१४) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, बीड.
१५) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, केज, जि. बीड.
१६) सभापती, पंचायत समिती, केज, जि. बीड.
१७) वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१६), मंत्रालय, मुंबई.
१८) नियोजन विभाग (का.१४४४), मंत्रालय, मुंबई.
१९) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई.
२०) कार्यासन वित्त-१ व योजना-७, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) निवडनस्ती, कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.